सन २०२१-२२ अर्थसंकल्पीय अनुदान
मागणी क्र. जे-५, ७६१०, शासकीय कर्मचारी
इत्यादींना कर्जे - मोटार वाहन/कार खरेदी अग्रिमे..

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग़**
**शासन निर्णय क्रमांक:- मोसाअ -१३२२ /(१) /प्र.क्र. ०४ /का-पाच,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ११ मार्च २०२२

<u>संदर्भ-</u> १) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अग्रिम २०१०/प्र. क्र. ३४/१०, विनियम, दि. ३० सप्टेंबर २०१०
२) शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्र. मोसाअ २०११/प्र. क्र. २४/११, का.५ दि. ७ जानेवारी २०१३
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अग्रिम २०१३/प्र. क्र. १०/२०१३, विनियम, दि. २० ऑगस्ट २०१४
४) शासन निर्णय वित्त विभाग शा.नि. क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर २०२१

**शासन निर्णय** :-

मागणी क्र. जे-५, मुख्यलेखाशीर्ष ७६१०, शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे, याखालील उपशीर्ष (२०२)(००)(०१) मोटार वाहन खरेदी अग्रिमे (७६१० ०४८१) यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून सोबत जोडलेल्या विवरणपत्र “ब” मधील स्तंभ २ येथील नमूद अधिकारी/कर्मचारी यांना मोटार वाहन खरेदी करण्यासाठी, स्तंभ ४ येथील नमूद नियंत्रक/मंजुरी अधिकारी यांना विवरणपत्र “अ” मधील स्तंभ ५ मध्ये दर्शविल्याप्रमाणे रु. १३,१५,३६०/- ( रु. तेरा लाख पंधरा हजार तीनशे साठ फक्त ) इतका निधी खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रमाणित करण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती** :-

१) हा निधी, सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार, मुंबई वित्तिय नियम, १९५९ मधील नियम १३६,१३७ व १३९ च्या अधिन राहून तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अग्रिम-२०१३/प्र.क्र. १०/२०१३/विनियम, दि. २०.०८.२०१४ मधील सूचना व विहित नियम/अटींच्या अधीन राहून तसेच सदर शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करून वितरित करण्याची दक्षता मंजुरी/नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

२) सर्व मंजुरी/नियंत्रक अधिकारी यांनी उपलेखाशीर्षनिहाय मासिक खर्चाचे नियोजन करुन अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे (BDS) तरतुदीचे वाटप आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना करावे. सदर अनुदानातून केला जाणारा खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार संगणकीय अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे (BDS) त्या त्या महिन्याचा खर्च त्याच महिन्यांमध्ये करण्यात यावा व तो मंजूर तरतुदींच्या मर्यादेत करण्यात यावा.

३) अर्जदार खरेदी करणार असलेल्या मोटार वाहनाची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम तात्काळ शासनास परत करावा व तसे शासनास अवगत करण्यात यावे.

४) अर्जदारास त्याच्या नांवासमोर दर्शविलेल्या रकमेइतकेच अग्रिम मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुस-या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही.

५) संबंधित अधिकारी/कर्मचारी एखाद्या मंजुरी/नियंत्रक अधिकाऱ्यांच्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेले असल्यास, अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर Authorisation Slip काढण्यापूर्वी, त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

६) मोटार वाहन अग्रिम अधिकारी/कर्मचा-यास त्यांच्या सेवा कालावधीत एकदाच देय राहील.

७) प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित केलेली रक्कम त्वरीत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी. तसेच काही कारणास्तव सदर अग्रिम मंजूर करण्यात येत नसेल अथवा नाकारण्यात येत असेल तर तसे या विभागास शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून १० दिवसाच्या आत कळविण्यात यावे. अन्यथा याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबधित मंजूरी/नियंत्रक अधिकारी यांची राहील.

८) प्रत्येक कार्यालयाने उद्दीष्ट निहाय केलेला दर महिन्याचा प्रत्यक्ष खर्च हा महालेखापाल यांच्या लेख्यामध्ये दर्शविण्यात आलेल्या खर्चाशी तंतोतंत जुळण्यासाठी http://agmaha.cag.gov.in या वेबसाईटवर दरमहा मासिक खर्चमेळाचे काम ऑनलाईन करण्यात यावे व पडताळणी केलेल्या खर्चाचे मासिक विवरणपत्र रिकंसिलीएशन कंप्लिशन स्लिपसह प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत या विभागाच्या कार्यासन ५/२४ कडे परस्पर पाठविण्यात यावे.

९) नविन मोटार सायकल अग्रिम वसूली ६० समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह, स्कूटर अग्रिम वसूली ४८ समान मासिक हप्त्यांमध्ये व्याजासह तसेच मोपेड अग्रिम वसूली ३० समान हप्त्यांमध्ये व्याजासह वसूल करण्यात यावी. तसेच नविन मोटार कार खरेदी करण्यासाठी मंजूर करण्यात येणा-या अग्रिमाची वसूली करताना प्रथमत: मुद्दलाची १०० समान मासिक हप्त्यात वसूली करावी व त्यानंतर व्याजाची वसूली ६० हप्त्यात करावी. मात्र, एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे प्रकरणपरत्वे १६०/६०/४८/३० महिने पूर्ण होण्यापूर्वीच सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसूली होईल, अशा प्रकारे वसूलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

१०) नविन मोटार वाहन, अपंग राज्य शासकीय कर्मचाऱ्यांसाठी स्वयंचलीत तीन चाकी सायकल, स्कूटर, मोपेडचा विमा शासकीय विमा निधीकडे उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची दक्षता घेण्यात यावी.

११) अग्रिमासाठी अर्ज करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांची शासनाच्या सेवेतील नियुक्ती संबंधित पदाच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात झाली असावी आणि नियुक्तीनंतर कमीत कमी पाच वर्षाची सलग सेवा झाली असावी.

१२) अग्रिम मंजूर केलेल्या कार्यालयीन आदेशाच्या प्रतीसह अर्जदाराने अग्रिम त्याच कारणासाठी वापरल्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागास ताबडतोब पाठविण्यात यावे. तसेच खरेदीखत आणि गहाणखताच्या प्रती संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून प्राप्त करुन घेऊन मंजूरी प्राधिका-यांनी आपल्या कार्यालयाच्या अभिलेखामध्ये जतन कराव्यात. संबंधित अर्जदारास अग्रीम मंजूरीच्या वेळी याबाबत आवश्यक सुचना देण्यात याव्यात. अन्यथा सदर प्रकरणी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रीम-१०९५/प्र.क्र.७०/९५/विनियम, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

१३) ज्या अधिकारी/कर्मचारी यांना मंजूर करण्यात आलेल्या मोटार सायकल अग्रिमाबाबत त्यांच्या सेवापुस्तकात त्याप्रमाणे नोंद घेण्यात यावी. नोंद घेतलेल्या सेवापुस्तकाची पृष्ठाची छांयाकिंत प्रत शासनास सादर करावी.

१४) हा खर्च "मागणी क्र.जे-५ मुख्यलेखाशीर्ष ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे, याखालील उपशीर्ष (२०२) (००) (०१) मोटार वाहने खरेदी अग्रीमे (संकेतांक ७६१० ०४८ १) -(योजनेतर/दत्तमत) यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१५) मोटार वाहने खरेदी अग्रिमाची वसुली ७६१०-शासकीय कर्मचा-यासाठी कर्जे इ., २०२-मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (७६१० ५०२ ४) या जमाशीर्षाखाली जमा करावी व त्यावरील व्याज ००४९ व्याजाच्या जमा रकमा ८०० इतर जमा रकमा, (०१) (४५) (ii) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा (००४९ १७४७) या जमाशीर्षाखाली जमा करावी.

१६) सदर, शासन निर्णय वित्त विभाग शा.नि. क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. १४ ऑक्टोबर २०२१ मधील तरतूदी नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३१११७१४४०२७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने. AKUSING NARSHI VASAVE

Digitally signed by AKUSING NARSHI VASAVE
DN: CN = AKUSING NARSHI VASAVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = LAW AND JUDICIARY DEPARTMENT
Date: 2022.03.11 17:20:10 +05'30'

**(आ.न.वसावे)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**सहपत्रः- विवरणपत्र "अ" व "ब"**

**प्रत,**

१ महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
२ मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई
३ प्रबंधक, (प्रशा), उच्च न्यायालय,मुंबई,खंडपीठ,औरंगाबाद
४ प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई
५ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ) महाराष्ट्र २, नागपूर
६ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७ निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८ प्रमख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, भंडारा
९ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जळगाव/कोल्हापूर/यवतमाळ/नागपूर/गोंदीया/चंद्रपूर
१०जिल्हा कोषागार अधिकारी, जळगाव/कोल्हापूर/यवतमाळ/नागपूर/गोंदीया/चंद्रपूर
११ वित्त विभाग, अर्थसंकल्प ७ व १० मंत्रालय, मुंबई.
१२ कार्यासन अधिकारी, कार्यासन -२३ व कार्यासन २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३ निवडनस्ती /का.५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

| विवरणपत्र "अ" | | | | |
|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्र. मोसाअ १३२२/(१)/प्र.क्र.०४ /का.पाच, दि. ११ मार्च २०२२ सोबतचे विवरणपत्र (आकडे रुपयात) | | | | |
| अ. क्र. | DDO/ CO code | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम (रुपये) |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | J००४१ | मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई अ.क्र. ०१ | नवीन मोटार सायकल | ७०००० |
| २ | J००२१ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, जळगाव अ.क्र. २ ते ४ | नवीन मोटार स्कुटर/सायकल/ कार | ५७३६५० |
| ३ | J००२६ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, कोल्हापूर अ.क्र. ५ | नवीन मोटार स्कुटर | ६०००० |
| ४ | ३१०१००४४३२ | प्रबंधक (प्रशा) उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद अ.क्र. ६ | नवीन मोटार सायकल | ६६८३० |
| ५ | J००११ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, यवतमाळ अ.क्र.७ व ८ | नवीन मोटार स्कुटर/सायकल | १२८८३० |
| ६ | ४६०१००४४४९ | प्रबंधक (प्रशा) उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर अ.क्र.९ | नवीन मोटार स्कुटर | ६०००० |
| ७ | J००३३ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, नागपूर अ.क्र. १० व ११ | नवीन मोटार सायकल/स्कुटर | ११०००० |
| ८ | J००३४ | प्रमुख न्यायधीश, कौटुंबिक न्यायालय, भंडारा अ.क्र.१२ | नवीन मोटार स्कुटर | ६०००० |
| ९ | J००७२ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, गोंदीया अ.क्र. १३ | नवीन मोटार सायकल | ६६०५० |
| १० | J००३५ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, चंद्रपूर अ.क्र. १४ व १५ | नवीन मोटार स्कुटर | १२०००० |
| | (रु. तेरा लाख पंधरा हजार तीनशे साठ फक्त) | | | १३१५३६० |

AKUSING NARSHI VASAVE

Digitally signed by AKUSING NARSHI VASAVE
DN: CN = AKUSING NARSHI VASAVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = LAW AND JUDICIARY DEPARTMENT
Date: 2022.03.11 17:20:49 +05'30'

(आ.न.वसावे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

| विवरणपत्र "ब" | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्र. मोसाअ १३२२/(१)/प्र.क्र.०४ /का.पाच, दि. ११ मार्च २०२२ सोबतचे विवरणपत्र, (आकडे रुपयात) | | | | | | |
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव | पदनाम | मंजूरी अधिकारी | प्रयोजन | मंजूर करावयाचे अग्रीम (रुपये) | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्रीमती. शर्मिला शांताराम शिंदे | लघुलेखक (उ.श्रे) | मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई | मोटार सायकल | ७०००० | नियमानुसार |
| २ | श्री. गणेश रामदास सावळे | वरिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, जळगाव | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| ३ | श्री. विनय वसंतराव मुगळीकर | मुख्य दंडाधिकारी | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, जळगाव | मोटरकार | ४५०००० | नियमानुसार |
| ४ | श्री.डिगंबर लालचंद बडगुजर | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, जळगाव | मोटार सायकल | ६३६५० | नियमानुसार |
| ५ | श्री. राजू शंकरराव चव्हाण | बेलिफ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, कोल्हापूर | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| ६ | श्री. गिरीष दादाराव पवार | सहायक कक्ष अधिकारी | प्रबंधक (प्रशा) उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद | मोटार सायकल | ६६८३० | नियमानुसार |
| ७ | श्री. नितिन देवीदास राठोड | बेलिफ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, यवतमाळ | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| ८ | श्री. उमेश रामकृष्णाजी साठे | बेलिफ | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, यवतमाळ | मोटार सायकल | ६८८३० | नियमानुसार |
| ९ | श्रीम.अर्पणा.न.परळकर | सहायक कक्ष अधिकारी | प्रबंधक (प्रशा) उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर | मोटार सायकल | ६०००० | नियमानुसार |
| १० | श्री. नंदकिशारे चंद्रभान मोहाडीकर | शिपाई | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, नागपूर | मोटार सायकल | ५०००० | नियमानुसार |
| ११ | श्रीमती. वर्षा सुरेश पंचभाई | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, नागपूर | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| १२ | श्री . रमेश बाबु ुराव सार्वे | कनिष्ठ लिपिक | प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, भंडारा | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| १३ | श्री. विष्णु आर. जाधव | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, गोंदीया | मोटार सायकल | ६६०५० | नियमानुसार |
| १४ | श्रीमती. सुनंदा देवेंद्र गाउत्रे | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, चंद्रपूर | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| १५ | श्रीमती. कल्पना महादेव ताजणे | कनिष्ठ लिपिक | प्रमुख जिल्हा व सत्र न्यायधीश, चंद्रपूर | नवीन स्कुटर | ६०००० | नियमानुसार |
| (रु. तेरा लाख पंधरा हजार तीनशे साठ फक्त) | | | | | १३१५३६० | |

AKUSING NARSHI VASAVE

Digitally signed by AKUSING NARSHI VASAVE
DN: CN = AKUSING NARSHI VASAVE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = LAW AND JUDICIARY DEPARTMENT
Date: 2022.03.11 17:21:03 +05'30'

( आ.न.वसावे )

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**